सन २०२३-२४ मध्ये लेखाशीर्ण २२४५ २१९४ अंतर्गत उणे (-) प्राधिकार पत्रावर कोषागारातून रक्कम आहरित करण्याकरिता प्राधिकृत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन,आ.व्य.प्रभाग),**
**मादाम काम मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक**
मंत्रालय,मुंबई-४०००३२.
शासन निर्णय क्र एससीवाय-०४/२०२३/प्र.क्र.३०/म-११
दिनांक:- २ ऑगस्ट, २०२३

**वाचा:-**

१) महसूल व वन विभाग, शासन निर्णय समक्रमांक दि.२६.४.२०२३.
२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.सीएलएस-२०२३/प्र.क्र.१६८/म-३, दि.२८.७.२०२३.

**प्रस्तावना :-**

चालू पावसाळी हंगाम म्हणजेच जून ते ऑक्टोबर, २०२३ या कालावधीत अतिवृष्टी व पूर यांसारख्या नैसर्गिक आपत्तींमुळे झालेल्या नुकसानीकरिता काही बाबींवर विशेष दराने मदत देण्यास संदर्भाधीन शासन निर्णय दि.२८.७.२०२३ अन्वये मान्यता देण्यात आलेली आहे. त्यानुसार वाढीव/विशेष दराने कपड्यांचे नुकसानीकरिता रु.२५००/- व घरगुती भांडी/वस्तू यांच्या नुकसानीकरिता रु.२५००/- असे मिळून रु.५०००/- प्रतिकुटुंब इतकी मदत लेखाशीर्ष २२४५ २१९४ अंतर्गत अनुज्ञेय आहे. तसेच दोन दिवसांपेक्षा अधिक कालावधीकरिता क्षेत्र/घर पाण्यात बुडालेले नसलेल्या प्रकरणांमध्ये वरीलप्रमाणे संपूर्ण मदत लेखाशीर्ष २२४५ २१९४ अंतर्गत अनुज्ञेय आहे. नैसर्गिक आपत्तीमध्ये आपत्तीग्रस्तांच्या मालमत्तेचे (कपडे, घरगुती भांडी/वस्तु) नुकसान झाल्यास त्यांना तातडीने मदत वाटप करणे शक्य व्हावे, म्हणून लेखाशीर्ष २२४५ २१९४ अंतर्गत जिल्हाधिकारी यांना उणे (-) प्राधिकार पत्रावर कोषागारातून रक्कम आहरित करण्यासाठी मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

नैसर्गिक आपत्तीमध्ये आपत्तीग्रस्तांच्या मालमत्तेचे (कपडे, घरगुती भांडी/वस्तु) नुकसान झाल्यास त्यांना तातडीने मदत वाटप करणे आवश्यक असल्याने सन २०२३-२४ या वित्तीय वर्षाचा खर्च भागविता यावा, म्हणून मागणी क्र. सी-६; मुख्य लेखाशीर्ष-२२४५, नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी अर्थसहाय; ०२, पूर चक्रीवादळे इ.; १०१, अनुग्रह सहाय्य; (९२) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकांव्यतिरिक्त खर्च; (९२) (०१) रोख भत्ता, मृत व्यक्तींच्या कुटुंबियांना सहाय्य व जखमींना मदत (अनिवार्य); ३१ सहायक अनुदाने ( वेतनेतर) **(२२४५ २१९४)** अंतर्गत जिल्हाधिकारी यांना उणे (-) प्राधिकार पत्रावर कोषागारातून रक्कम आहरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. उणे प्राधिकारपत्रावर निधी वितरीत करताना संबंधित अधिकारी यांनी पंचनामे झाले असल्याची खातरजमा करून निधी वितरीत करावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२४८/२०२३/व्यय-९, दि.३१.७.२०२३ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०८०२२२०६०४९११९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY AUDUMBAR DHARURKAR

Digitally signed by SANJAY AUDUMBAR DHARURKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RELIEF AND REHABILITATION DEPARTMENT, 2.5.4.20=637145fd393d6d5c713e94e6da7bc6bee23011448b7fc64d138630b9c76ae7a2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FCF7172A73579B34FA622983D8FB647780FBEF1D35A1CA975955EB9193F3F800, cn=SANJAY AUDUMBAR DHARURKAR
Date: 2023.08.03 11:47:15 +05'30'

**( संजय धारूरकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.विरोधी पक्ष नेता, विधान परिषद/ विधान सभा, महाराष्ट्र विधान भवन, मुंबई
४. विधान मंडळाचे सर्व सन्माननीय सदस्य
५. अपर मुख्य सचिव ( वित्त), मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव ( पदुम), मंत्रालय, मुंबई
७. आयुक्त, पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, औंध,पुणे
८. सर्व विभागीय आयुक्त
९. सर्व जिल्हाधिकारी
१०. मा.महालेखापाल -१/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
११. मा.महालेखापाल -१/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
१२. संचालक, लेखा व कोषागरे, मंत्रालय, मुंबई
१३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१४. सर्व जिल्हा कोषागर अधिकारी
१५. वित्त विभाग (व्यय-९/अर्थ-६)मंत्रालय, मुंबई
१६. सह सचिव, (ब-१/२), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. कार्यासन अधिकारी म-३, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१८. निवडनस्ती (म-११)